**आंळदी मध्यम प्रकल्पाच्या धरण व दोन्ही कालव्याच्या विशेष दुरुस्ती अंतर्गत करावयाच्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत ....**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रमा - २०१४/( ६०९ /२०१४)/सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २१ .०३.२०१७

वाचा :-

संदर्भ **१) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश ,नाशिक यांचे पत्र क्र.**
**i)उमप्र/तां२.२/६२५५/२०१४.दि.२६/८/२०१४.**
**ii)मुअ/उमप्र/तां.२/१४९५/२०१५,दि.१४/३/२०१५.**
**२) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. गोमपाविम तां-५/ ५०६४ दि.०२.०६.२०१५.**

**प्रस्तावना**

आळंदी मध्यम प्रकल्प ता. जि. नाशिक हा २७.४८ दलघमी क्षमतेचा प्रकल्प असून मुख्य धरणाचे काम सन १९८३ मध्ये व कालव्याची कामे सन १९९३ साली पूर्ण होऊन प्रकल्प सिंचन व्यवस्थापनाकडे सन १९९४ साली हस्तांतरीत करण्यात आला आहे. प्रकल्पाचे सिंचन क्षेत्र ६२९६ हेक्टर इतके असून कालवे व वितरकांची लांबी सुमारे ४६.५० कि.मी.आहे. प्रकल्पाचे बांधकाम सुमारे २५ ते ३० वर्ष जूने आहे. या प्रकल्पाच्या धरण व कालव्याचे भराव मजबूतीकरण करणे,बांधकामे दूरूस्ती,सेवापथ दुरूस्ती इ.करुन सुमारे ४०० हेक्टर सिंचन क्षेत्राची पुनर्स्थापना करण्याचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा विकास पाटबंधारे महामंडळ, औरंगाबाद यांनी सादर केला आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

**या शासन निर्णयाव्दारे आंळदी मध्यम प्रकल्प ता.जि. नाशिक येथील प्रकल्पाचे दुरुस्ती कामास रु. ४३५.१३ लक्ष (रु. ३९५.५८ लक्ष कामानिमित्त, व रु.३९.५५ लक्ष च्या अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

१) मा.राज्यपाल महोदयांचे दि.१४/०८/२००९ च्या पत्रान्वये महामंडळाच्या वार्षिक अर्थसंकल्पीय तरतूदीच्या २% मर्यादेपर्यंत “वाढ-विस्तार, नूतनीकरण, व सुधारणा (ERM)”प्रस्ताव हाती घेण्याच्या सूचना आहेत. त्यानुसार महामंडळातंर्गत “वाढ-विस्तार, नूतनीकरण, व सुधारणा (ERM)” अंतर्गत चालू कामांचा आढावा घेण्यात यावा. त्यानुसार वाढ-विस्तार, नूतनीकरण, व सुधारणा (ERM) साठी उपलब्ध निधीतून या योजनेचा खर्च बसू शकत नसेल तर काम हाती घेण्यापूर्वी मा. राज्यपाल महोदयांची पूर्व मान्यता घेणे आवश्यक राहील.

२) जलसपंदा विभाग शासन परिपत्रक क्र.प्रमा २०१३/(७८५/१३)/सिं.व्य. (कामे), दि.०१.०१.२०१५ मधील परिच्छेद क्र.११,१२ व १३ नुसार अभिलेखे ठेवावेत.

३) योजनच्या लाभक्षेत्रात MMISF अधिनियमनुसार पाणी वापर संस्था स्थापन करण्यात याव्या व त्यांच्याकडून १०% लोकवर्गणी घेवून सदर कामांचा कार्यारंभ आदेश देण्यात यावा. तसेच नियोजित कामे पूर्ण झाल्यावर पाणी वापर संस्थेला कार्यक्षेत्र हस्तांतरीत करणे बंधनकारक राहील.

४) दरसूची बाहय बाबीचे दर व संकल्पनांना सक्षम स्तरावर मान्यता घेण्यात यावी.

५) कालवा संकल्पन परिपत्रक दि.२६/०७/२०१५ नुसार कालव्यावरील पूलांची व इतर बांधकाम दुरुस्तीची कामे करण्यात यावीत.

६) गाळ काढणे ,माती भरावाची व कालवा स्वच्छतेची कामे विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडून करण्यात यावीत.

७) प्रस्तावातील तांत्रीक बाबींची तपासणी केली असून जलशास्त्रीय तांत्रिक गरजेनुसार अस्तरीकरण करण्यात यावे.

८) अंदाजपत्रकातील प्रस्तावित पूलाच्या बांधकामाचे मूल्यमापन (Vetting) सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम प्राधीकाऱ्याकडून करण्यात यावे.

९) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

१०) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

११) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पूर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे.

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा विशेष दुरुस्ती १२ ( ०४ ) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ( ४७०१ जे १९४ ) या मुख्य लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय विअप्र- **२०१३/**(प्रक्र **३०/२०१३**) विनियम भाग **२** दि.**१७.४.२०१५** मधील भाग पहिला उपविभाग - **३** मधील अ.क्र.**४** मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु. **५.००** कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार विभागाच्या आंतरवित्तीय सल्लागार यांच्या सहमतीने व नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३८/का-१४३४, दि.२३/०२/२०१६अन्वये दिलेल्या सहमतीनुसार हे आदेश निर्गमित केले.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये ९ सन २०१६-१७ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०३२११४५४०७७४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.03.21 14:59:14 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई.
२. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई.
५. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
६. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
७. स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. स्वीय सहायक, सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०.महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे.
१२.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक.
१४. मुख्य अभियंता, (विप्र) जलसंपदा विभाग, पुणे.
१५.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१७.अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, सोलापूर.
१८.कार्यकारी अभियंता, नाशिक पाटबंधारे विभाग, नाशिक
१९.सिं.व्य.(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१४/ (प्र.क्र. ६०९ /२०१४)/ सिं.व्य.(कामे) दि. **२१/०३/२०१७** चे सहपत्र

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये) | कामाच्या आवश्यकतेचा तपशील |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| अ) | मुख्य शिर्ष कामे | १८.६९ | अश्मपटल व रॉक टो ची दुरुस्ती |
| ब) | व्दितीयकालवा व वितरिका | | |
| १) | एल- मातीकाम | १७५.७८ | कालव्याच्या माती भरावाचे मजबूतीकरण व आवश्यक लांबीत अस्तरीकरण |
| २) | डी- विमोचके | २३.२० | पाणी वापर संस्थाना पाणी मोजुन देण्यासाठी वितरीकांवर प्रवाहमापकांची तरतूद केली आहे. |
| ३) | एफ़-आर.एच.टी. कामे | १०२.४१ | जुन्या बांधकामाचे मजबुतीकरण, जसे जॅकेटींग, गनाईटींग, ढासळलेल्या बांधकामाच्या पक्ष भितींची संधानकात बांधकाम प्रस्तावित |
| ४) | एच- एस्केप | १०.०१ | डावा कालवा सा क्र १२३०० मी वरील ढासळलेले बांधकाम नव्याने बांधणे प्रस्तावित केलेले असून सदरचे काम न केल्यास पावसाळयात पावसाचे पाणी कालव्याबाहेर काढून देण्यासाठी व्यवस्था नसल्याने भराव फुटून कालव्याचे मोठया प्रमाणावर नुकसान होण्याची शक्यता आहे. |
| ५) | जी- पूल | ६५.४९ | कालव्याची शहरी भागातील लांबी साधारणत: २३ किमी असून कालव्यावरील पुलावरुन मोठया प्रमाणात अवजड वाहनांची रहदारी होत असल्याने व सदरची बांधकामे ही दगडी बांधकामात असल्याने मोठया प्रमाणात पडझड झालेली असून नवीन पूल प्रस्तावित केलेले आहेत. |
| | एकूण | ३९५.५८ | |
| | आस्थापना खर्च (१०%) | ३९.५५ | |
| | **एकूण किंमत** | **४३५.१३** | |

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.03.21 14:59:47 +05'30'

**( न. गौ. बसेर )**

**शासनाचे अवर सचिव**